चंद्रपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय परिसरात खाजगी भागिदारी तत्वावर १०० खाटांचे कर्करोग रुग्णालय निर्माण करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : जीएचसी-२०१८/४१८/प्र.क्र १६७/प्रशा-१**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,

९ वा मजला, मुंबई-४०० ००१.

दिनांक : २६ जून, २०१८.

**वाचा :** संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्रमांक संवैशिवसं/ शावैमवरुचं /कर्करोग रुग्णालयप्रस्ताव/३९२६ /अ - ५ /२०१८ दिनांक २०.०४.२०१८

**प्रस्तावना :**

चंद्रपूर या जिल्ह्याची लोकसंख्या २३ लक्ष असून त्यात दरवर्षी ०.६ टक्क्याने वाढ होत आहे. सदर जिल्ह्यामध्ये कोळसा व चुनखडी खडकाच्या खाणी असून मोठे औद्योगिक क्षेत्र तसेच महाऔष्णिक केंद्र अस्तित्वात आहे. सदर जिल्हयात प्रदुषणाचे प्रमाण मोठे आहे. चंद्रपूर येथे कर्करोग आजाराने ग्रस्त असलेल्या रुग्णांचे प्रमाण मोठे आहे.

सदर परिसरातील व नजीकच्या जिल्हयातील कर्करोगग्रस्त रुग्णांना सर्वंकष व अत्याधुनिक कर्करोग उपचाराच्या सोयी सुविधा उपलब्ध होण्यासाठी राज्य शासनासह, कर्करोग उपचार व संशोधन या क्षेत्रामध्ये अग्रगण्य व नामांकित संस्था असलेल्या टाटा न्यास ( ट्रस्ट ) तसेच जिल्हा खनिज प्रतिष्ठान, चंद्रपूर यांच्या माध्यतातून खाजगी भागीदारी तत्वावर चंद्रपूर येथे १०० खाटांचे कर्करोग रुग्णालय उभारणी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने मा. मंत्रिमंडळाच्या मान्यतेने पुढील प्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१. विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर संस्थेची उभारणी करण्यात येणाऱ्या परिसरात राज्य शासन (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई), जिल्हा खनिज प्रतिष्ठान, चंद्रपूर व टाटा न्यास (ट्रस्ट) यांच्या माध्यमातून खाजगी भागीदारी तत्वावर १०० खाटांचे कर्करोग रुग्णालय उभारण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर १०० खाटांचे कर्करोग रुग्णालय उभारण्यासाठी व त्याचे संचलन करण्यासाठी विशेष कृती समिती (स्पेशल पर्पज व्हेईकल (एसपीव्ही)) ची स्थापना कंपनी कायदा, २०13 मधील तरतूदींनुसार करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर संस्थेची उभारणी करण्यात येणाऱ्या परिसरातील विभागाच्या अखत्यारीत ५० एकर जमिनीपैकी सुमारे १० एकर जागा सदर प्रकल्पासाठी निर्माण करण्यात येणाऱ्या कंपनीस / संस्थेस ३० वर्षासाठी नाममात्र दराने भुईभाड्याने देण्याबाबत जाणीवपूर्वक मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

४. सदर रूग्णालय/प्रकल्प कार्यान्वित झाल्यानंतर व्यवहार्यदृष्टीने चालविण्या इतपत सक्षम होई पर्यन्त प्रथम सात वर्ष प्रतिवर्षी सुमारे २० कोटी (सुमारे १२८ कोटी) रुपयांचे अनुदान/निधी राज्य शासनातर्फे याबाबत स्थापन करण्यात येणाऱ्या कंपनीस उपलब्ध करून देणेबाबतच्या राज्य शासनाच्या आर्थिक दायित्वास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

५. सदर प्रकल्प/रुग्णालय कार्यान्वित झाल्यानंतर व्यवहार्यदृष्टीने चालविण्याइतपत सक्षम होई पर्यन्त प्रथम सात वर्षे प्रतिवर्षी सुमारे २० कोटी (सुमारे १२८ कोटी) रुपयांचे राज्य शासनातर्फे देण्यात येणाऱ्या अनुदानासह, सदर प्रकल्प/रुग्णालयासाठी राज्य शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या जमिनीची किंमतही राज्य शासनाचा सदर प्रकल्पासाठीचे समभाग भाग-भांडवल म्हणून ग्राह्य धरण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

६. सदर खाजगी भागिदारी तत्वावर तयार करण्यात येणाऱ्या प्रकल्प/रुग्णालयासाठी सामंजस्य कराराचा मसुदा तयार करण्यासाठी अपर मुख्य सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखाली, अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, अपर मुख्य सचिव, उद्योग, प्रधान सचिव व विधी परामर्शी, विधी व न्याय

विभाग, सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, संबधित भागिदारी संस्थेने नामनिर्देशित केलेले प्रतिनिधी व आवश्यकतेनुसार अन्य सभासदांचा समावेश असणारी समिती नेमण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

७. सदर समितीने अंतिम केलेल्या सामंजस्य कराराच्या मसुद्यास शासन मान्यता घेण्यात येईल. तद्नंतर सदर प्रकल्पात सहभागी सर्व सदस्यांच्या सहमतीने सामंजस्य करार स्वाक्षांकित झाल्यानंतर सदर प्रकल्प कार्यान्वित करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

८. सदर विषयी वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या वतीने सामंजस्य करारावर सही करण्यास संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांना प्राधिकृत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

९. सदर प्रकल्पासाठी निर्माण करण्यात येणाऱ्या विशेष कृती समिती व कार्यकारी समितीमध्ये नेमावयाच्या नागरी संघटनेतील प्रतिनिधीची नियुक्ती करण्याचे अधिकार मा. मुख्यमंत्री यांना राहतील. सदर प्रतिनिधींचा कार्यकाल ७ वर्षाचा राहील, यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६२६१२२४४६४३१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.06.26 12:38:33 +05'30'

(अ.मु.डहाळे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव, मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव तथा विधी परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव, विधान मंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
१३. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१४. सर्व सहसचिव/उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. विभागीय आयुक्त, नागपूर.
१६. जिल्हाधिकारी, चंद्रपूर.
१७. आयुक्त, चंद्रपूर महानगरपालिका, चंद्रपूर.
१८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, चंद्रपूर.
१९. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
२०. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
२१. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
२२. जिल्हा खनिज प्रतिष्ठान, चंद्रपूर.
२३. व्यवस्थापक टाटा न्यास ( ट्रस्ट ) , मुंबई.
२४. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर.
२५. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय/दंत/आयुर्वेद महाविद्यालये व व संलग्नित रुग्णालये.
२६. जिल्हा शल्य चिकीत्सक, चंद्रपूर.
२७. जिल्हा कोषागार अधिकारी, चंद्रपूर.
२८. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२९. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३०. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान मंडळ, मुंबई.
३१. मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान मंडळ, मुंबई.
३२. सचिव (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३३. निवड नस्ती (प्रशा-१).